प्रकल्प अहवालास मान्यता देण्याबाबत-
आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा
ता. पाचोरा जि. जळगाव.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रकल्प १२२५/प्र.क्र.०४/टेक्स१ (ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२५

**वाचा:**

१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. सूतगि २१९३ / प्र.क्र.१८६ / टेक्स १, दि. ११.०८.१९९३.
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. सूतगि ११९७ /प्र.क्र. १९३ /टेक्स-१, दि.२४.०३.१९९९.
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सुतगि १२००/ प्र.क्र.१५३ / टेक्स-१, दि.१३.६.२०००
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सूतगि-३३१६/प्र.क्र.८१/टेक्स-१ (अ), दि.१०.०७.२०१७.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.धोरण-२०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दि.१५.०२.२०१८.
६. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. प्रकल्प १२१५/प्र.क्र५०/टेक्स१अ, दि.१७.०६.२०२१.
७. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. धोरण-२०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दि.०२.०६.२०२३
८. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. संकिर्ण-३१२२/२३ VIP/ प्र.क्र.१२/टेक्स-१ (ब), दि.२४.०९.२०२४
९. वस्त्रोद्योग आयुक्तालयाचे पत्र क्र. कार्या-६(१) (सूतगि)/ आशिर्वाद पाचोरा/८४९५/२०२४/ दि.१०.१०.२०२४
१०. सुकाणू समितीच्या दिनांक ०६.०२.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

## प्रस्तावना :-

आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा ता. पाचोरा जि. जळगाव या सूतगिरणीची नोंदणी दि. १५.०१.२०२० रोजी झाली असून शासन निर्णय दि.२४.०९.२०२४ नुसार सदर सूतगिरणीची १०:४०:५० या आकृतीबंधानुसार शासन अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली

आहे. शासनाने दि.१७.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सहकारी सूतगिरणीची प्रकल्प किंमत ८०९०.०० लाख इतकी निश्चित केलेली आहे. सूतगिरणीने महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई यांचेकडून २५५३६ चात्यांचा रूपये ८०९०.०० लाखांचा प्रकल्प अहवाल तयार करून घेतला आहे. वस्त्रोद्योग आयुक्तालयाच्या दि.१०.१०.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सूतगिरणीचा रु.८०९०.०० लाख इतक्या किंमतीचा प्रकल्प अहवाल शासन निर्णयार्थ सादर करण्यात आला आहे. आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा ता. पाचोरा जि. जळगाव ही सूतगिरणी नव्यानेच अर्थसहाय्यासाठी निवड केलेली असल्यामुळे ही सूतगिरणी रु. ८०९०.०० लाख इतकी प्रकल्प किंमत निश्चित करण्यास पात्र ठरते. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या सुकाणू समितीच्या दि.०६.०२.२०२५ रोजीच्या बैठकीत आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा ता. पाचोरा जि. जळगाव या सूतगिरणीच्या १०:४०:५० या आकृतीबंधानुसार रुपये ८०९०.०० लाखाच्या प्रकल्प अहवालाच्या किंमतीस मान्यता देण्याचा निर्णय घेण्यात आला. आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा ता. पाचोरा जि. जळगाव या सूतगिरणीच्या रु.८०९०.०० लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा ता. पाचोरा जि. जळगाव या सूतगिरणीचा समावेश दि.२४.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासन अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास मंजुरी देण्यात आली आहे. शासन निर्णय दि.१७.०६.२०२१ अन्वये निश्चित केलेल्या रु.८०९०.०० लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीच्या मर्यादेत या सूतगिरणीच्या प्रकल्पास, त्या त्या बाबींसाठी मंजूर कमाल मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च गिरणी स्वनिधी उभारुन करेल या अटीवर सदर सूतगिरणीच्या १०:४०:५० या आकृतीबंधानुसार रु.८०९०.०० लाख इतक्या प्रकल्प किंमतीस खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून त्याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.

२) शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.

३) सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.

४) सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

५) सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

६) दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

२. या सूतगिरणीचे सभासद भागभांडवल व शासकीय भागभांडवल व दीर्घ मुदती कर्ज यांचे प्रमाण खालीलप्रमाणे राहील:

| अ.क्र. | तपशील | प्रकल्प किंमतीनुसार उभारावयाची रक्कम(लाखात .रू) |
|---|---|---|
| १ | सभासद भागभांडवल १०% | ८०९.०० |
| २ | शासकीय भागभांडवल ४०% | ३२३६.०० |
| ३ | दीर्घ मुदती कर्ज ५०% | ४०४५.०० |
| | एकूण | ८०९०.०० |

३. या सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्यामर्यादेत या सूतगिरणीने खर्च करणे सूतगिरणीस बंधनकारक राहील.

| अ.क्र. | तपशील | प्रकल्प अहवालाप्रमाणे मंजूर खर्च (रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | जमीन व जमीन सुधारणा | १७२.०० |
| २ | फॅक्टरी इमारत व इतर बांधकाम | १९०८.३८ |
| ३ | प्लँट अँड मशिनरी | ४०६७.२९ |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ९११.०० |
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ८८.८७ |
| ६ | प्रि-ऑपरेटिव्ह खर्च | १८७.०० |
| ७ | मार्जिन मनी | ४११.१२ |
| ८ | कॉन्टीजंसी | ३४४.३३ |
| | एकूण | ८०९०.०० |

४. सूतगिरणीने रु.८०९०.०० लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास जास्तीची रक्कम सूतगिरणीने स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील. प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूतगिरणीला स्वतः करावा लागेल. तसेच यंत्रसामुग्री खरेदी व स्थापत्य

बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ नुसार मान्यता घ्यावी. सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१८३७४२६४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

CHITRA
RAVINDRA BISEN

Digitally signed by CHITRA RAVINDRA BISEN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f789a84db3cd4420e2db86c40df943d84a7873bde6b53430a5e3b150b091368e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0BD6EA041CD6F49090B004C64DAAE9708BF029C76F9B139C454C2A8EA66C7EA3, cn=CHITRA RAVINDRA BISEN
Date: 2025.03.24 18:38:35 +05'30'

**(चित्रा बिसेन)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) जिल्हाधिकारी, जळगाव.
८) प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, मुंबई.
९) जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, जळगाव.
१०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई
११) कार्यासन अधिकारी १६-सी / १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१३) अध्यक्ष, आशिर्वाद सहकारी सूतगिरणी मर्या.पाचोरा ता. पाचोरा जि. जळगाव
१४) निवडनस्ती-टेक्स १ (ब)